**विशेष प्रसिद्धी मोहीम** -
**महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास निधी उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मावज- २०१४/ प्र.क्र.२७०/३४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
तारीख: २२ ऑगस्ट, २०१४.

**वाचा -**

१) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे पत्र क्र.महासंचालक (मा.वज.) /निधी/२०१४/८३,दिनांक ४ ऑगस्ट, २०१४.

२) महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाचे पत्र क्र. मपविम/प्रवजसं/८५५/२०१४, दिनांक ७ ऑगस्ट, २०१४.

**प्रस्तावना -**

शासन राबवत असलेल्या विविध कल्याणकारी योजनांची माहिती समाजातील सर्व स्तरातील जनतेपर्यंत प्रभावीपणे पोहचविण्यासाठी विशेष प्रसिद्धी मोहीम राबविण्यात येत आहे. या मोहिमेअंतर्गत विकासकामांची जाहीरात व प्रसिद्धी करण्यासाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास रु. ३०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय —**

शासनाच्या विशेष प्रसिद्धी मोहिमेसाठी उपलब्ध रु.९३.२७ कोटी निधीपैकी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास दृक-श्राव्य (Audio-Visual) जाहिराती व होर्डिंगवरील जाहिराती या कामासाठी रु. ३०.०० कोटी निधी मंजूर व वितरित करण्यास मान्यता देण्यात येत असून जाहिरात निर्मिती आणि वितरणाबाबतची पुढील कार्यवाही या प्रयोजनासाठी नियुक्त करण्यात आलेल्या मंत्रीगटाच्या मान्यतेने करावी.

२. उपरोक्त प्रसिद्धींच्या कामासाठी मंजूर केलेली तरतूद आहरित करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ व त्यांच्या कार्यालयातील मुख्य लेखाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबत तसेच महालेखापाल यांच्या लेख्याशी खर्च ताळमेळ घालण्याची कार्यवाही करावी. तसेच सदर निधी संबंधितांना प्रत्यक्ष वितरीत झाल्यानंतर त्याची देयके/खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्याची जबाबदारी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाची राहील.

३. सदर बाबींवरील खर्च सन २०१४ च्या पावसाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर झालेल्या रु.९३.२७ कोटी अनुदानातून, सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र. ए-६, २२२०, माहिती व प्रसिद्धी, ६० इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिद्धी (००)(०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिद्धी मोहीम (योजनांतर्गत), २६ जाहिरात व प्रसिद्धी (संगणक सांकेतांक क्र. २२२०११७५) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

४. सदर निधी खर्च करताना महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाने वित्तीय नियमावली/शासन निर्णय/परिपत्रके/मार्गदर्शक तत्वे/केंद्रीय दक्षता आयोगाची मार्गदर्शक तत्वे /महानियंत्रक व लेखापरीक्षक यांची निरीक्षणे / प्रसिध्दीबाबत मा.सर्वोच्च न्यायायालयाची मार्गदर्शक तत्वे इ.चे पालन करण्याच्या व शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतींचा अवलंब करण्याच्या अटींच्या अधीन राहून वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.७८३/१४/व्यय-४, दिनांक १४ ऑगस्ट,२०१४ अन्वये मान्यता दिलेली आहे.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २३३/१४४३, दिनांक ८ ऑगस्ट,२०१४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७८३/१४/व्यय-४,दिनांक १४ ऑगस्ट,२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२२१५४५०८८१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

MUSALE RAMKISAN NARAYANRAO

Digitally signed by MUSALE RAMKISAN NARAYANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GOVT. OF MAHARASHTRA,CID - 916891, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eb28cc64e4adc3dd948671d0896f641e3e54c25e6deb33a784d0a3d037ae7ff8, cn=MUSALE RAMKISAN NARAYANRAO
Date: 2014.08.22 15:45:28 +05'30'

**( रा. ना. मुसळे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) अपर मुख्य सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

३) सचिव, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

६) व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.

७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.

९) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.

१०) उपसचिव कार्यासन/१४४३, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

११) उपसचिव कार्यासन- व्यय/४ व सहसचिव (अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) उपसचिव, कार्यासन/२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) उपसचिव कार्यासन/३४, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.

१६) निवडनस्ती/कार्या.३४, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.